रोजंदारी व कार्यव्ययी आणि नियमित
आस्थापनेवरील कर्मचारी तसेच रिक्त पदावर
नेमलेले तात्पुरते/रोजंदार कर्मचारी यांच्या सेवा
समाप्त केल्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक:एसआरसी-१०८८/२३१५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १२. ८. १९८८

परिपत्रक

रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचारी व कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचारी यांना कालेलकर समेटानुसार अस्थायी आस्थापनेवर वा स्थायी आस्थापनेवर आणण्याबाबत कार्यवाही करण्यात आल्यानंतर सुध्दा कर्मचारी गरजेपेक्षा जास्त असल्यास त्यांना औद्योगिक कलह अधिनियम, १९४७ च्या तरतुदीनुसार नोटीस देऊन कमी करता येते. अशा कर्मचाऱ्यांच्या प्रश्नासंबंधात विधान परिषद सभागृहात झालेल्या चर्चेच्या वेळी असे निदर्शनास आणण्यात आले होते की, कर्मचाऱ्यांची चुकीच्या पध्दतीने कपात करण्यात येते. त्यावर शासनाकडून असे स्पष्ट करण्यात आले की, कामगारांना कमी करताना नियमांचे पालन केले नसेल तर त्याचे समर्थन करता येणार नाही. संबंधित अधिकाऱ्यांनी नियमांचे पालन केले नसेल तर त्याबाबत जरूर कारवाई करण्यात येईल. तरी सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील रोजंदार व कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या सेवा समाप्त करताना नियमांचे पालन योग्य प्रकारे केले जाईल याची दक्षता घेण्याबाबत सूचना त्यांच्या अधिपत्याखालील संबंधित अधिकाऱ्यांना द्याव्यात व योग्य प्रकारे नियमांचे पालन करण्यात आले नसल्यास त्या संबंधात योग्य ती कारवाई करावी.

२. चर्चेच्या वेळी आणखी असेही निदर्शनास आणण्यात आले होते की, शून्याधारित अर्थसंकल्प सुरू झाला त्यावेळी अनेक रिक्त पदे भरण्यात आली नव्हती. तथापि अशा पदांवर तात्पुरते रोजंदारीवर नेमलेले लोक अनेक वर्षांपासून काम करीत होते; त्यांच्या सेवा समाप्त करण्यात आल्या आहेत. तरी ह्या बाबतची परिस्थिती विभागांनी तपासून पहावी. ... सभागृहात शासनाकडून असे स्पष्ट करण्यात आले की, अशा कर्मचाऱ्यांपैकी जे कर्मचारी अतिरिक्त संवर्गात समावेश करण्याबाबत अटींची पूर्तता करतात त्यांना अतिरिक्त संवर्गात घेण्यात येईल. तरी सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की वर नमूद केल्याप्रमाणे त्यांच्या अधिपत्याखालील

कार्यालयातून रिक्त पदावर अशा प्रकारे तात्पुरत्या/रोजंदारी पध्दतीने नेमणुका केलेल्या असल्यास आणि संबंधित व्यक्तींना दीर्घकाळ सेवेत चालू ठेवून शून्याधारित अर्थसंकल्पानुसार केलेल्या कार्यवाहीत - त्यांच्या सेवा समाप्त करण्यात आल्या असतील तर त्यांच्या पैकी जे कर्मचारी अतिरिक्त संवर्ग कक्षात समाविष्ट करण्यासाठी अटींची पूर्तता करतात त्यांची नावे व सेवा विषयक तपशील अतिरिक्त संवर्ग कक्षात समाविष्ट करण्याबाबत कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व मंत्रालयीन विभाग.